**माजी राष्ट्रपती स्व.डॉ.ए.पी.जे.अब्दुल कलाम यांचा दिनांक १५ ऑक्टोबर हा जन्मदिवस “वाचन प्रेरणा दिन” म्हणून साजरा करणेबाबत.**

# महाराष्ट्र शासन

## शालेय शिक्षण व क्रीडा विभाग

## शासन परिपत्रक क्रमांकः संकिर्ण-२०१८/प्र.क्र.१९८/एस.डी.-४

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक :- १२ ऑक्टोबर, २०१८

**वाचा :-** शालेय शिक्षण व क्रीडा विभाग,शासन परिपत्रक क्र.उपक्रम-२३१५/प्र.क्र.२४२/एस.डी.४,
दिनांक ०७ ऑक्टोबर,२०१५.

**शासन परिपत्रक:-**

माजी राष्ट्रपती स्व.डॉ.ए.पी.जे.अब्दुल कलाम यांच्या स्मृतीजतन करण्याच्या उद्देशाने दिनांक १५ ऑक्टोबर हा त्यांचा जन्म दिवस " वाचन प्रेरणा दिन” म्हणून साजरा करण्याचा निर्णय शासनाने घेतला आहे. या निर्णयास अनुसरून शालेय विद्यार्थ्यामध्ये वाचनाची प्रेरणा निर्माण करण्यासाठी व वाचनाची आवड वृध्दींगत करण्याच्या दृष्टीने यापूर्वी संदर्भाधीन शासन परिपत्रकान्वये सूचना देण्यात आल्या होत्या. त्याचप्रमाणे या वर्षी सुध्दा “वाचन प्रेरणा दिन” साजरा करण्याच्या दृष्टीने सर्व माध्यमाच्या सर्व व्यवस्थापनाच्या शाळांना विविध उपक्रमांचे आयोजन करण्याबाबत पुढीलप्रमाणे सूचना देण्यात येत आहे.

१. दिनांक १५ ऑक्टोबर,२०१८ रोजी सर्व माध्यमांच्या सर्व व्यवस्थापनाच्या शाळांनी या कार्यक्रमाचे आयोजन करावे. सर्व शालेय विद्यार्थी,शिक्षक वर्ग आणि शिक्षकेतर कर्मचारी यांनी कामकाजाच्या वेळेमध्ये किमान अर्धा तास वाचनासाठी द्यावा, वाचनाकरिता समुहाने एकत्रितपणे बसून आपला वेळ वाचनासाठी सलग काही तास “वाचन ध्यास” म्हणून व्यतीत करावा.

२. वाचन संस्कृती जोपासण्यासाठी सर्वांनी आपले मित्र,कुटूंबातील सदस्य इत्यादींना किमान एक पुस्तक भेट द्यावे.

३. भारतातील पहिलं पुस्तकांच गाव (भिलार,ता.महाबळेश्वर,जि.सातारा) या उपक्रमाची माहिती विविध माध्यमांतून विद्यार्थ्यांना द्यावी किंवा निवडक विद्यार्थ्यांना घेऊन या ठिकाणी सहलींचे आयोजन करण्यात यावे.

४. संकल्प - महिन्यातील एक दिवस " नो गॅजेट डे" म्हणून कृतीत आणण्याचे आवाहन. (" नो गॅजेट डे"- मोबाईल,व्हॉटस्ॲप,फेसबूक,ट्विटर न वापरता तो वेळ वाचनासाठी देणे.)

५. पुष्पगुच्छ नव्हे पुस्तक (बुके नव्हे बूक) - सार्वजनिक कार्यक्रमांत पाहुण्यांना पुष्पगुच्छाऐवजी पुस्तक भेट देण्याच्या शासन निर्णयाची अंमलबजावणी व प्रसार. (वाढदिवशी किंवा वाचन प्रेरणा दिनाचे निमित्त साधून परस्परांना पुस्तक भेट देण्याचे आवाहन)

६. शाळा, महाविद्यालय,ग्रंथालय व इतर संस्थांनी आपल्या परिसरात "डॉ.ए.पी.जे.अब्दुल कलाम वाचन कट्टा" निर्मिती करावी.

७. "वाचन प्रेरणा" ही चळवळ होण्याकरिता प्रत्येक व्यक्तीचे योगदान महत्वाचे आहे. यासाठी खालीलप्रमाणे विविध उपक्रमांचे आयोजन करण्यात यावे.

- अ) "एक व्यक्ती एक पुस्तक भेट" हा उपक्रम राबवला जावा. प्रत्येक व्यक्तीने/शिक्षकांनी/माजी विद्यार्थ्यांनी/पालकांनी एका विद्यार्थ्याला/शाळेला/विद्यार्थ्याच्या वयाला अनुरूप होतील अशी पुस्तके भेट द्यावीत.
- ब) विद्यार्थ्यांना आनंदाने वाचन करण्यास देण्यासाठी 'वाचू आनंदे' या तासिकेचे आयोजन करणे.
- क) चांगल्या पुस्तकांविषयी चर्चासत्रांचे आयोजन करणे.
- ड) डॉ.ए.पी.जे.अब्दुल कलाम यांच्या पुस्तकांवर आधारित व्याख्यानांचे आयोजन करणे.
- इ) परिसरातील लेखक/कवींना विद्यार्थ्यांशी संवाद साधण्यासाठी आमंत्रित करणे.
- ई) पुस्तक प्रदर्शनाचे आयोजन करणे.
- उ) 'महान व्यक्तींच्या आयुष्यात वाचनामुळे घडलेले संस्कार' याविषयीची माहिती देणे.
- ऊ) आंतरराष्ट्रीय, राष्ट्रीय नेते व वाचन यांची उदाहरणे देवून चर्चासत्रे घडून आणणे.
- ए) पुस्तकांचे वाटप करून 'वाचन दिन' व 'अध्यापन दिन' साजरा करणे.
- ऐ) विद्यार्थ्यांचे गट करून विविध पुस्तकांवर चर्चासत्रे घडवून आणणे.
- ओ) शाळांनी पुढाकार घेवून 'पुस्तके तुमच्या भेटीला' अशा कार्यक्रमांचे आयोजन करावे.

८. वाचनाची आवड व सवय विद्यार्थ्यांमध्ये लागावी याकरिता उपरोक्त उपक्रम उदाहरणादाखल देण्यात आलेले आहेत. याव्यतिरिक्त देखील विविध उपक्रम शाळा स्तरावर आयोजित करता येवू शकतील.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक २०१८१०१२१२५०४०८८२१ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Milind Saraf

Digitally signed by Milind Saraf
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=School Education And sports Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=0d8450ee89cd863fe6ee37a1ae9a08856aba16105c18d8f6e7e5d173cd0667f3, cn=Milind Saraf
Date: 2018.10.12 12:52:40 +05'30'

**( मिलिंद सराफ )**
कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१) आयुक्त (शिक्षण),महाराष्ट्र राज्य,पुणे,
२) राज्य प्रकल्प संचालक,महाराष्ट्र प्राथमिक शिक्षण परिषद,मुंबई
३) संचालक,महाराष्ट्र राज्य शैक्षणिक संशोधन व प्रशिक्षण परिषद ,पुणे
४) शिक्षण संचालक (माध्यमिक व उच्च माध्यमिक),शिक्षण संचालनालय,महाराष्ट्र राज्य,पुणे,
५) शिक्षण संचालक (प्राथमिक) ,शिक्षण संचालनालय,महाराष्ट्र राज्य,पुणे
६) सर्व विभागीय शिक्षण उपसंचालक ,
७) प्राचार्य,जिल्हा शैक्षणिक सातत्यपूर्ण विकास संस्था (सर्व),
८) शिक्षणाधिकारी ,(निरंतर/माध्यमिक/प्राथमिक)जिल्हा परिषद (सर्व) /सर्व शिक्षण निरीक्षक,बृहन्मुंबई महानगरपालिका ,
९) शिक्षण प्रमुख,महानगरपालिका,प्रशासन अधिकारी/नगरपालिका (सर्व),
१०) निवड नस्ती (कार्या.एस.डी.४).